**इतर मागासवर्गीयांसाठी केंद्र शासनाच्या नागरी सेवा आणि पदावर आरक्षण, नियुक्तीसाठी सधन व संपन्न गट ( क्रीमीलेअर ) वगळून इतर उमेदवारांच्या प्रमाणपत्र सादर करण्याबाबत.**

---------------------------------------------------

**महाराष्ट्र शासन**
**विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : सीबीसी -१०/२०००/ प्र.क्र. ६७ / इमाव -५**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक** : ७ एप्रिल, २०००

वाचा : १) शासन परिपत्रक समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग क्र. सीबीसी-१०९४/४४८३/प्र.क्र.८५/मावक-५,दि. १९.४.१९९४,
२) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग क्र. सीबीसी -१०९४ / ४४८३ / प्र.क्र.८५ / मावक -५, दि. २४.१.१९९५,
३) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांसकृतिक कार्य व क्रिडा विभाग क्र. सीबीसी - १०९४ / ४४८३ / प्र.क्र. ८५ / मावक -५, दि. ६.३.१९९५
४) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग क्र. सीबीसी - १०९४/४४८४/ प्र.क्र. ८५ / मावक -५, दि. ३.११.१९९५
५) शासन पत्र, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, क्र. सिबीसी - १०९४ / ४४८४ / प्र.क्र. ८५/ मावक -५, दि. २१.१२.१९९५
६) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, क्र. सीबीसी - १०९४/४४८३ / प्र.क्र.८५ / मावक - ५, दि. ४.१.१९९६
७) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. सीबीसी - १०९६ / प्र.क्र. ४८ / मावक -५, दि. ३ जून, १९९६

**शासन परिपत्रक** : संदर्भाधीन परिपत्रकानुसार इतर मागासवर्गीयांसाठी केंद्र शासनाच्या नागरी सेवा आणि इतर पदावर आरक्षण नियुक्तीसाठी सधन आणि संपन्न गट ( क्रिमी लेअर ) वगळून इतर उमदेवारांची जातीची प्रमाणपत्रे सादर करण्याबाबतच्या सूचना वेळोवळी निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. संदर्भाधीन १९.४.१९९४ व दि. ३.११.१९९५ च्या शासन परिपत्रकानुसार इतर मागासवर्गीयांची यादी जोडलेली आहे. केंद्र शासनाच्या विहित केलेल्या नमुन्यात विहित इतर मागासवर्गीयांना संदर्भाधीन परिपत्रकानुसार दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्रमाणपत्र व क्रीमीलेअर प्रमाणपत्र देण्यात येते.

२. केंद्र शासनाच्या या राज्यासाठी घोषित केलेल्या इतर मागासवर्गीयांच्या यादीमध्ये या राज्यातील काही विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्गातील जातींचा समावेश आहे या जाती केंद्र शासनाच्या इतर मागासवर्गाच्या यादी मध्ये मोडत असल्यामुळे त्या जातींना केंद्र शासनाच्या सवलतीचा लाभ मिळण्याकरिता क्रिमीलेअरचे तत्व लागू आहे. त्यामुळे केंद्र शासनाच्या इतर मागासवर्गीयांच्या यादीत समाविष्ट असलेल्या राज्य

शासनाच्या विमुक्त जाती, भटक्या जमाती व इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग जातीच्या व्यक्तींना केंद्र शासनाच्या नागरी सेवा आणि पदावर आरक्षण नियुक्तीसाठी केंद्राने विहित केलेल्या नमुन्यात जातीचे प्रमाणपत्र व क्रिमीलेअर प्रमाणपत्र देण्यात यावे व राज्या शासनाच्या अखत्यारित नोक-यासांठी विहित केलेल्या नमुन्यात जातीची वेगवेगळी प्रमाणपत्रे देण्यात यावी. उदाहरण राज्यातील विमुक्त जाती मध्ये अंर्तभूत केलेल्या समाजातील व्यक्तीला राज्य शासनाच्या सवलतीसाठी विमुक्त जाती म्हणून तर केंद्र शासनाच्या सवलतीसाठी इतर मागासवर्ग म्हणून दोन वेगवेगळी जातीची प्रमाणपत्रे द्यावी लागतील.

३. वरील बाब विचारात घेऊन केंद्र शासनाच्या अखत्यारीतील सवलती व राज्य शासनाच्या अखत्यारीतील सवलती यासाठी स्वतंत्र वेगवेगळी दोन जातीची प्रमाणपत्रे शासन निर्णय दिनांक ३ जुन, १९९६ च्या सोबतच्या विहित केलेल्या नमुन्यात देण्यात यावीत.

४. वरील सूचनांचे जातीची प्रमाणपत्रे देणा-या सर्व सक्षम प्राधिका-यांनी काटकोरपणे पालन करावे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( वि. वा. मेहेर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्याचे सचिव,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
मुख्य महानगर दंडाधिकारी,
सर्व विभागीय आयुक्त,
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग संचानालय, पुणे.
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सर्व जिल्हा दंडाधिकारी
सर्व उप विभागीय अधिकारी ( महसूल )
सर्व उप जिल्हाधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,

**सर्व मंत्रालयीन विभाग**

**त्यांना विनंती करण्यांत येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अधिपत्याखाली सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.**

निवड नस्ती का -इमाव -५